राज्य माहिती आयोगाच्या विविध खंडपीठात प्रतिनियुक्तीने नियुक्ती

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एएससी १५१७/प्र.क्र.१३७/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २८ ऑगस्ट, २०१८

## शासन आदेश

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत करावयाची कार्यपध्दती सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१७/प्र.क्र.१२०/१४, दिनांक ३१.८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. या शासन निर्णयातील तरतूदीनुसार मंत्रालयीन विभागातील कर्मचाऱ्यांच्या सेवा राज्य माहिती आयोगाचे, मुख्यालय, १३ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२ यांच्या अधिपत्याखालील राज्य माहिती आयोगाच्या खालील नमूद रकाना ४ मधील कार्यालयांमध्ये प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नांव व पदनाम | सध्याचा विभाग | प्रतिनियुक्तीचे ठिकाण | प्रतिनियुक्तीचे ठिकाणावरील पदनाम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्रीमती मा.रा.सोनावणे, सहायक कक्ष अधिकारी | सामान्य प्रशासन विभाग | राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ | सहायक कक्ष अधिकारी |
| २. | श्री.सु.शे.हाके, लिपिक-टंकलेखक | जलसंपदा विभाग | राज्य माहिती आयोग, औरंगाबाद खंडपीठ | लिपिक-टंकलेखक |

२. उपरोक्त नमूद कर्मचाऱ्यांची सेवा त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या राज्य माहिती आयोगाच्या कार्यालय व पदनाम या पदावर प्रथमत: **दोन वर्षाच्या कालावधीसाठी** खालील अटींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(अ) ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला संबंधित कर्मचारी आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारील त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/संवर्ग नियंत्रण अधिकारी/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्याला मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्याने मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्याला मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

३. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा...इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुदी विचारात घेऊन, सामान्य प्रशासन विभाग व जलसंपदा विभागाने प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती याबाबत सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-६ यांच्याशी सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

४. उपरोक्त परिच्छेद १ मधील अनुक्रमांक १, येथील कर्मचाऱ्याच्या बाबतीत सामान्य प्रशासन विभाग व अनुक्रमांक २ येथील कर्मचाऱ्याच्या बाबतीत जलसंपदा विभाग, हे त्यांचे प्रशासकीय विभाग असल्यामुळे या कर्मचाऱ्यांच्या प्रशासकीय बाबी संबंधित प्रशासकीय विभाग व सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन ६ यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

५. संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी विभागाने तत्काळ कार्यमुक्त करावे.

६. प्रतिनियुक्ती ही संबंधित कर्मचाऱ्याची व प्रतिनियुक्तीवरील कार्यालयाची तात्पुरती व्यवस्था असून संबंधित कर्मचाऱ्याची प्रतिनियुक्तीने नेमणूक करण्यात आल्यास त्या कर्मचाऱ्याच्या विभागात त्या कर्मचाऱ्याची कमतरता रिक्त पदांअभावी नेहमी जाणवते. प्रतिनियुक्तीच्या ठिकाणावरील कार्यालयाने सदरहू कर्मचाऱ्याचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होताच त्याचे सेवा त्याच्या मूळ विभागास प्रत्यावर्तीत करावे. त्या कर्मचाऱ्याच्या प्रतिनियुक्तीचा कालावधी वाढविण्याबाबत/मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव/विनंती संवर्ग नियंत्रणकडे सादर करण्यास टाळावे.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२८१७०२३८१००७ असा आहे. सदरहू आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.08.28 17:05:13 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**संबंधित कर्मचारी (विभागामार्फत)**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सामान्य प्रशासन विभाग/जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२. सह/उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग/जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२
३. सचिव, राज्य माहिती आयोग, मुख्यालय, १३ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालयसमोर, मुंबई-४०० ०३२.
५ उप सचिव, राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ, नवीन प्रशासकीय इमारत, ४था मजला, विधानभवनासमोर, पुणे-४११ ००१
६ उप सचिव, राज्य माहिती आयोग, औरंगाबाद खंडपीठ, बचत भवन, लेखा व कोषागारे कार्यालयाच्या पाठीमागे, औरंगाबाद
७. उप सचिव (कार्यासन क्र.६), सामान्य प्रशासन विभाग, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयसमोर, मुंबई ४०० ०३२.
त्यांना विनंती करण्यात येते की, सदर कर्मचाऱ्यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने त्वरेने उपलब्ध होतील याबाबत त्यांनी संबंधित विभागाकडे पाठपुरावा करावा.
८. साप्रवि/१४-अ (संग्रहार्थ)